सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) च्या अधिनस्त असलेल्या, शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील वाहनांचा आढावा...

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांकः- २४ जुलै, २०१५.

वाचा:- १) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन १०००/प्र.क्र.६५/विनियम, दि. १९.०६.२००१

२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन १०.०५/प्र.क्र.१३/विनियम, दि. २५.०२.२००५

३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन १००७/प्र.क्र.४८/२००७/विनियम, दि. ३१.१२.२००७

४) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन २०१०/प्र.क्र.५०/विनियम, दि. १०.०१.२०११

५) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा,मुंबई यांचे पत्र जा. क्र. शापसे/मो.वा.लि./ २०१४/ २८६७, दि. २४.११.२०१४

६) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा,मुंबई यांचे पत्र जा. क्र. शापसे/मो.वा.लि./२०१४/ २८६७, दि. २४.११.२०१४

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) या विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयामार्फत, मुंबई येथे भेट देणाऱ्या अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी इत्यादी मान्यवरांच्या परिवहनव्यवस्थेसाठी, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाच्या अधिनस्त डी. व्ही. वाहनांचा ताफा ठेवण्यात येतो. सदर वाहनांच्या परिरक्षण व दुरूस्ती व इंधनाचा खर्च त्या कार्यालयामार्फत केला जातो. सदर कार्यालयातील डी. व्ही. वाहने ना-दुरूस्त व जुनी झाली असल्याने ती वाहने निर्लेखित केल्यामुळे त्या वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्याचे तसेच राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेसाठी वाहने अनुज्ञेय करण्याबाबत वाहनाचा आढावा घेण्याचे शासनाच्या विचाराधिन होते. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाकरिता, अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी व इतर मान्यवर यांच्या परिवहन व्यवस्थेसाठी खालील तक्त्यात नमूद केल्या प्रमाणे एकूण ५४ वाहनाचा आढावा मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वाहनाचा प्रकार | आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहनांची संख्या |
|---|---|---|
| १ | डी. व्ही. कार | ५२ |
| २ | टोईंग व्हॅन (मध्यम आकाराची | १ |
| ३ | बस | १ |
| | **एकूण** | **५४** |

२. वरीलप्रमाणे राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने, शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी वाहने अनुज्ञेय केली असून, त्यापैकी एकूण १७ वाहने (१५ डी. व्ही. कार, १-टोईंग व्हॅन (मध्यम आकाराची), १- बस) खरेदीस मान्यता दिली आहे. सदर वाहने खरेदी करताना आढाव्यात मंजूर वाहन संख्येपेक्षा अधिक वाहने होणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.

३. शा.प.से कार्यालयाकरिता खरेदी करण्यात येणाऱ्या टोईंग व्हॅन (मध्यम आकाराची) या वाहनाकरिता वाहनचालकाचे व्यपगत करण्यात आलेले पद पुनर्जिवित करण्यात येवू नये, अस्तित्वात असलेल्या वाहन चालकांमधून वाहन चालक उपलब्ध करून देण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५१/१५/विनियम, दि. २.०७.२०१५ अन्वये प्राप्त वित्त विभागाच्या सहमती व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०७२४१२४५४८१४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Nagnath Shivram Bhoge

Digitally signed by Nagnath Shivram Bhoge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nagnath Shivram Bhoge
Date: 2015.07.24 12:49:03 +05'30'

**( ना. शि. भोगे )**

**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग तथा अध्यक्ष राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,

३) अपर मुख्य सचिव (प्र.सु.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

४) परिवहन आयुक्त, सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती

५) सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६) संचालक, शासकीय परिवहन सेवा, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई

७) नियंत्रक,शासकीय परिवहन सेवा, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई

८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०) कक्ष अधिकारी, (व्यय-४/विनियम), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई

११) निवडनस्ती/कार्यासन-३१.